**वर्धा जिल्ह्यात दहेगाव (गोसावी) येथे**
**<u>नविन पोलीस ठाणे निर्माण करणेबाबत.</u>**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक - पीओएस २५००/१४८/प्र.क्र.१/पोल - ३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३४२, दिनांक - १२ ऑगस्ट, २००२

**वाचा:-** (१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६/४७/वर्धा/दहेगाव (गो)/०२, दि. ४.६.२००२.

**<u>प्रस्तावना :-</u>** वर्धा निर्वाचन क्षेत्रात सेलू व सिंधी (रेल्वे) हे दोन पोलीस ठाणे कार्यरत आहेत. हे दोन [redacted] पोलीस ठाणे तालुक्याच्या दोन वेगवेगळया टोकावर असून दहेगाव (गोसावी) हे गाव सेलू व सिंधी (रेल्वे) पोलीस ठाणेच्या मध्यभागी आहे. सदर पोलीस स्टेशनना दळणवळणांच्या साधना अभावी नागरिकांना सदर पोलीस ठाणेंना संपर्क साधण्यात अडचण निर्माण होते. प्रस्तूत बाबींचा विचार करता दहेगाव (गोसावी), ता.सेलू, जि.वर्धा या ठिकाणी पोलीस ठाणे निर्माण करण्याबाबत लोकप्रतिनिधीं मार्फत शासनास वेळोवेळी निवेदने सादर करण्यात आलेली आहेत.

**<u>शासन निर्णय :-</u>** मौ. दहेगाव (गोसावी), ता.सेलू, जि.वर्धा या ठिकाणी वरील वस्तुस्थिती लक्षात घेता एक विशेष बाब म्हणून नविन पोलीस ठाणे निर्माण करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. प्रस्तावित दहेगाव (गोसावी) पोलीस ठाणे हे सेलू पोलीस ठाणे व सिंधी (रेल्वे) पोलीस ठाण्याच्या विभाजनातून निर्माण करण्यात येत आहे. दहेगाव पोलीस ठाणे करिता आवश्यक २३ पदे (१ सहाय्यक पोलीस निरीक्षक, ३ सहाय्यक पोलस उप निरीक्षक, ४ पोलीस हवालदार व १५ पोलीस शिपाई ) पोलीस अधीक्षक, वर्धा यांच्या आस्थापनेवरील मंजूर पोलीस मनुष्यबळातून उपलब्ध करुन देण्यात यावीत. तसेच सदर पालीस ठाणेसाठी आवश्यक खालील नमूद साधनसामुग्रीचा अनावर्ती खर्च रु.४,४६,०००/- सन २००२-२००३ या आर्थिक वर्षात मंजूर अनुदानातून भागवण्यात यावा.

**<u>साधनसामुग्री</u>**

| | | |
|---|---|---|
| (१) | जीप - | रु. ३,३५,०००/- |
| (२) | १ दूरध्वनी - | रु. १,०००/- |
| (३) | फर्निचर - | रु. १,००,०००/- |
| (४) | टंकलेखन यंत्र - | रु. १०,०००/- |
| | | रु.४,४६,०००/- |

वरील खर्च लेखाशीर्ष "२०५५-पोलीस-१०९-जिल्हा पोलीस-(००)-(०१)-जिल्हा पोलीस बल " खाली दर्शविण्यात यावा.

३.        नविन दहेगाव (गोसावी) , ता.सेलू, जि.वर्धा या प्रस्तावित पोलीस ठाण्याकरिता मु.पो.दहेगाव येथील श्री.किरण भैय्याजी उरकांदे यांनी सुमारे ३०,००० चौ.फूट ( २७८८.९. चौ.मि.) क्षेत्रफळाची जमीन दि. १२.७.२००२ रोजी बक्षिस पत्राने पोलीस अधीक्षक, वर्धा यांना दिलेली आहे. सदर बक्षिस पत्राची नोंदणी दुय्यम निबंधक, सेलू यांच्याकडे झालेली आहे. बक्षिसपत्राने मिळालेल्या सदर जागेवर पोलीस ठाण्याचे बांधकाम करण्यासाठी श्री. प्रमोद शेंडे, मा. विधानसभा उपाध्यक्ष यांनी आमदार निधीतून रु.५ लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन दिलेला आहे.

४.        दहेगाव (गोसावी) येथे नविन पोलीस ठाणे करिता आवश्यक २३ पदे मंजूर मनुष्यबळातून उपलब्ध करुन देण्यात येणार असल्याने अपेक्षित आवर्ती खर्चाचा अतिरिक्त भार शासनावर पडणार नाही. तसेच साधनसामुग्री वरील अनावर्ती खर्च रु.४,४६,०००/- सन २००२-२००३ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागवण्यात येणार आहे. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३६८२/२००२/प्र.स(वित्त) दि.१२.८.२००२ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( सं. शं. इंगळे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन,

प्रत,
पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक,नागपूर,
पोलीस अधीक्षक,वर्धा,
प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी,वर्धा,
वित्त विभाग, व्यय-७,
गृह विभाग, कार्यासन बीयुडी-१ / पोल-५(अ) व (ब) / पोल- ७,
निवडनस्ती **(पोल-३)**

गृह (शहरे) राज्यमंत्री 13/8/2002

